राज्य योजना सन २०१७-१८ निसर्ग पर्यटन योजने अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०४.१७ /प्र.क्र. १२१/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ६ सप्टेंबर, २०१७.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५ /अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७.
२. वित्त विभागाचे परिपत्रक कमांक :-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०.०६.२०१७.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निगर्स पर्यटन मंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२/ यो/सिध्दगड/३०३/२०१७-१८, दिनांक :- २४.०८.२०१७.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.१५/१०५७/२०१७-१८, दिनांक ३१.०८.२०१७.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निगर्स पर्यटन मंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२/ यो/ नि.प. प.क्र./३३७/२०१७-१८, दिनांक :- ०५.०९.२०१७.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०४/१०९२/२०१७-१८, दिनांक ०५.०९.२०१७.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निगर्स पर्यटन मंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२/ यो/ नि.प. प.क्र.३/३३२/२०१७-१८, दिनांक :- ०४.०९.२०१७.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०४/१०७७/२०१७-१८, दिनांक ०४.०९.२०१७.

प्रस्तावना :-

सन २०१७-१८ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु. १४६८६.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी सामाजिक वनीकरणाच्या तीन योजनांचा नियतव्यय रु. ६६८६.०० लक्ष वगळता निव्वळ संरक्षित क्षेत्र व इतर वनक्षेत्रातील निसर्ग पर्यटनासाठी रुपये ८०००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. उक्त योजनेमधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१७ पर्यत खर्च करण्यास संदर्भ कमांक १ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार **"अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संरक्षित क्षेत्राबाहेरील पर्यटन क्षेत्रांच्या विकासासाठी फ-५ कार्यासनामार्फत रु. १७४९.८१ लक्ष तर संरक्षित क्षेत्रातील पर्यटना क्षेत्रांच्या विकासासाठी फ-१ कार्यासनामार्फत रु. १२३९.५७ लक्ष असा एकूण रु. २९८९.३८ लक्ष निधी उपरोक्त योजनांतर्गत वितरीत करण्यात आला आहे.

३. दरम्यानच्या काळात वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ च्या परिपत्रकानुसार सन २०१७-१८ मधील निधी वितरणाबाबत सुधारीत आदेश निर्गमित केले आहेत. सदर आदेशात खालील प्रमाणे नमूद करण्यात आले आहे.

**" वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकानुसार निश्चित केलेल्या निधी वितरणाच्या मर्यादेमध्ये बदल करण्यात येत असून प्रशासकीय विभागांना चालू वित्तीय वर्षाच्या कालावधीसाठी महसूली लेख्यातील निधी ७०% तसेच भांडवली लेख्यातील निधी ८०% इतक्या मर्यादेत उपलब्ध करुन देण्यात येत आहे."**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निगर्स पर्यटन मंडळ, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३, ५ व ७ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे मार्फत सन २०१७-१८ करीता निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत संरक्षित क्षेत्र व संरक्षित क्षेत्राबाहेरील पर्यटन स्थळाकरीता रु. ८३२.५४ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सदर शासन निर्णयान्वये सन २०१७-१८ करीता निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४, ६ व ८ च्या पत्रान्वये भिमांशकर अभयारण्य अंतर्गत सिध्दगड विकास कामे, भिमाशंकर येथे महादेव वन उभारणे व नवेगांव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया विकास कामांकरीता रु. ६२७.०९ लक्षच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१७-१८ मध्ये लेखाशिर्ष क्र.२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीतून खर्च करण्यात यावी.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निगर्स पर्यटन मंडळ, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सदर केलेल्या कार्यबाबींवरच खर्च करण्यात यावा.
३. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे, याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा आणि याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची राहील.
४. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या कार्य पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.
५. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही या अटीवर मंजूरी देण्यात येत आहे.
६. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.
७. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३/३९ दिनांक २६.११.२०१४ चे काटेकोर पालन करावे.
८. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५, क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनां१८.४.२०१८ व कमांक :-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०.०६.२०१७. च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक:- १८.०४.२०१७ व कमांक :-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दिनांक ३०.०६.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०६१७०६०५६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2017.09.06 16:55:34 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति :**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
७. मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
८. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगांव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
९. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१०. निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.